**म्हाडाच्या गोरेगाव सिध्दार्थ नगर सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या पुनर्विकासाच्या अनुषंगाने म्हाडाने जारी केलेल्या दि.२६.०७.२०११ चे ना-हरकत प्रमाणपत्र तसेच दि.०९.११.२०११ च्या संयुक्त करार पत्रान्वये केलेल्या सुधारणा संदर्भात चौकशी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वाटप- २०१८/प्र.क्र.१४३/गृनिप**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई
दिनांक : १२ जून, २०१८

**<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय क्रमांक : वाटप- २०१८/प्र.क्र.१४३/गृनिप, दि. २८.०३.२०१८**
**२) शासन निर्णय क्रमांक : वाटप- २०१८/प्र.क्र.१४३/गृनिप, दि. १८.०४.२०१८**

**<u>प्रस्तावना-</u>**

मुंबईतील गोरेगाव मधील पत्राचाळ येथील गोरेगाव सिध्दार्थ नगर सह. गृह. संस्था मर्यादीतच्या संयुक्त पुनर्विकास प्रकल्पामध्ये विकासक मे. गुरुआशिष कंन्स्ट्रक्शन प्रा. लि. यांनी म्हाडा व रहिवाशांच्या इमारतीचे बांधकाम विहित कालावधीत पूर्ण न करणे, रहिवाशांचे भाडे थकविणे, विक्री हिश्श्याची परस्पर त्रयस्थ विकासकांना विक्री करणे या अनुषंगाने मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि. २२.११.२०१७ रोजी बैठक घेण्यात आली. सदरहू बैठकीत मा. मुख्यमंत्री महोदयांनी दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने सदरहू पुनर्विकास प्रक्रियेमध्ये म्हाडाने दि.२६.०७.२०११ रोजी जारी केलेले ना-हरकत प्रमाणपत्र व तद्नंतर दि.०९.११.२०११ च्या करारनाम्यान्वये मुळ करारनाम्यान्वये केलेल्या सुधारणा व या संदर्भात श्री. कामदार, ज्येष्ठ विधिज्ञ यांनी दि.०८.०३.२०१८ रोजी दिलेले अभिप्राय विचारात घेऊन या प्रकरणी सखोल चौकशी करुन एका महिन्यात शासनास अहवाल सादर करण्याकरीता श्री. जॉनी जोसेफ, निवृत्त मुख्य सचिव यांची दि. २८.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आली आहे. त्यानुसार श्री. जॉनी जोसेफ, निवृत्त मुख्य सचिव यांनी कार्यवाही सुरु केली आहे. मात्र अद्याप अहवाल सादर केलेला नसल्यामुळे या प्रकरणी अहवाल सादर करण्यास त्यांना दि. २७.०५.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय:-</u>**

शासनाच्या संदर्भाधीन दि. २८.०३.२०१८ च्या निर्णयान्वये म्हाडाच्या गोरेगाव सिध्दार्थ नगर सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या पुनर्विकासाच्या अनुषंगाने म्हाडाने जारी केलेल्या दि.२६.०७.२०११ चे ना-हरकत प्रमाणपत्र तसेच दि.०९.११.२०११ च्या संयुक्त करार पत्रान्वये केलेल्या सुधारणा संदर्भात चौकशी करुन शासनास अहवाल सादर करण्यासाठी श्री. जॉनी जोसेफ, निवृत्त मुख्य सचिव यांना दि. २७.०५.२०१८ पर्यंत मुदत वाढ देण्यात येत आहे.

श्री. जॉनी जोसेफ, निवृत्त मुख्य सचिव यांनी आपला अहवाल दि. २७.०५.२०१८ पर्यंत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१२१६२०१५६१०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Ramchandra Parkar

Digitally signed by Manohar Ramchandra Parkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c4c0810e9c94cf92d42a36d93c8f7b6ac18542c1ee758c9cfddcea906d9cf544, serialNumber=fb43688343316856c0f7e793462127aa87fce45724e87929c6889798cd7d2c62, cn=Manohar Ramchandra Parkar
Date: 2018.06.12 16:23:21 +05'30'

**(म. रा. पारकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई-३५.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/ विधानपरिषद, विधानभवन, मुंबई-३२.
४) मा. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य.
५) मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
६) मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
७) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.
८) महालेखापाल, महाराष्ट्र - १, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा).
९) महालेखापाल, महाराष्ट्र - २, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा).
१०) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
११) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई-५१.
१२) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, मुंबई-५१.
१३) गृहनिर्माण विभागातील उप सचिव
१४) निवड नस्ती - गृनिप.